२०११०११४१५४५४९००१

**पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका**

पिंपरी -चिंचवड शहर महानगरपालिका आस्थापनेवर वाहन चालक अभिनामाची ४२ पदे नव्याने निर्माण करण्यास मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्र.पीसीसी-३००८/१२४६/प्रक्र-३७९/२००८/नवि-२२

मंत्रालय, मुंबई- ४०००३२,

दिनांक :- २६ एप्रिल, २०१०

वाचा : १) आयुक्त,पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशा १अ/कावि/ ८०१/ २००८ दिनांक १०.०७.२००८ त्यासोबतचे महानगरपालिका ठराव क्र. ३४४ दिनांक २०.०५.२००८

२) आयुक्त,पिंपरी-चिंचवड शहर मनपा यांचे पत्र क्र.प्रशा-१/कावि/८९२/०८ दिनांक १०.०७.२००८

३) सहायक आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशा-१अ/ कावि / १०२१/ २००८ दिनांक २०.०९.२००८

४) सहायक आयुक्त,पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशा-१अ/ कावि/ १०६३/२००८ दिनांक १८.११.२००८

५) सहायक आयुक्त,पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशा-१अ/ कावि/ २४९/२००९ दिनांक ०६.०५.२००९.

६) सहायक आयुक्त,पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.प्रशा-१अ/ कावि/ ७०२/२००९ दिनांक ०६.११.२००९.

**प्रस्तावना:**

पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिकेकडे सद्यस्थितीत ३०६ वाहनांकरीता फक्त २३८ पदे मंजूर असून, उर्वरीत वाहने चालविण्यासाठी वाहनचालक आवश्यक आहेत. त्यामुळे महानगरपालिकेतील कामाची वाढती व्याप्ती व आरोग्य विभागाच्या अत्यावश्यक सेवेत सुसुत्रता येण्याची आवश्यकता या बाबी विचारात घेवून, महानगरपालिकेने महासभा ठराव क्र. ३४४ दि. २०.०५.२००८ अन्वये वाहनचालक अभिनामाची ४२ पदे नव्याने निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्याकरीता मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने महानगरपालिकेच्या आस्थापनेवर वाहन चालकांची ४२ पदे निर्माण करण्यास व या पदांची शैक्षणिक अर्हता निश्चित करण्यास

मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः**

आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती विचारात घेवून, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर **"वाहनचालक"** या अभिनामाची ४२ पदे नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ५१ (४) आणि ४५७ (३)(अ) अन्वये प्राप्त अधिकारात शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. वाहन चालक या पदाची शैक्षणिक अर्हता व पात्रता पुढीलप्रमाणे राहील.

**अर्हता व पात्रता :-**

अ) मोटार वाहन नियम १९३९ नुसार जड वाहन व जीप कार चालविण्याचा परवाना आवश्यक.

ब) इयत्ता ७ वी उत्तीर्ण , मराठी व हिंदी भाषा बोलता येणे आवश्यक.

क) जडवाहन/जीप/कार चालविण्याचा किमान ३ वर्षाचा अनुभव

ड) स्वच्छ रेकॉर्ड व वाहन दुरुस्तीची माहिती असणे आवश्यक

इ) शारीरीकदृष्ट्या सक्षम व संबंधित परिसराची माहिती असणे आवश्य

**ई) भरती पध्दती:-** १०० टक्के सरळसेवेने.

०३. सदरील आदेशानुषंगाने आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सर्व संविधानिक बाबीची पूर्तता करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ सुनिल कोठेकर ]
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,
१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.सचिव(२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) आयुक्त, पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
४) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
५) निवडनस्ती (नवि-२ २), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२